महाराष्ट्र जिल्हा परिषद (जिल्हासेवा)
सेवा प्रवेशोत्तर परीक्षा-२००९.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
परिपत्रक क्रमांक : परिक्षा २००९/प्र.क्र.५५९/आस्था-१०
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑक्टोबर, २००९.

परिपत्रक

महाराष्ट्र जिल्हा परिषद (जिल्हा सेवा) सेवा प्रवेशोत्तर परीक्षा नियम १९८५ मधील नियम ७ नुसार सदर परीक्षा वर्षातून एकदा नोव्हेंबर किंवा डिसेंबर या महिन्यात विभागीय आयुक्तांकरवी घेण्याबाबतची तरतुद करण्यात आलेली आहे. सदर तरतुदीनुसार महाराष्ट्र जिल्हा परिषद, (जिल्हासेवा) सेवा प्रवेशोत्तर परिक्षा २००९ ही शनिवार दिनांक २६ डिसेंबर, २००९ आणि रविवार दिनांक २७ डिसेंबर, २००९ रोजी घेण्याचे निश्चित करण्यात आलेले आहे.

२. शासन अधिसूचना ग्राम विकास विभाग क्रमांक : डीएसबी-१०८५/सीआर-२२१/१३, दिनांक २० जानेवारी, १९८६ अन्वये प्रसिध्द केलेल्या अधिसुचनेनुसार ही परीक्षा खालील पाठयक्रमानुसार ३ विषयांची असून ती मराठीतून घेण्यात येईल.

| अ.क्र. | विषय | विहित केलेली पुस्तके | प्रश्न पत्रिकेचा अवधी | गुण |
|---|---|---|---|---|
| १)पेपर क्र.१ भाग (एक) (पुस्तका आधारे) | जिल्हा परिषदा पंचायत समित्या व ग्राम पंचायत यांचे सामान्य प्रशासन. | १) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१.<br>२) मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८<br>३)नागरी हक्क संरक्षण अधिनियम १९५५ | ३ तास | एकुण १०० गुण<br>६० गुण |
| भाग-२ (पुस्तका शिवाय ) | | टिप्पणी लेखन व मसुदा, कार्यालयीन कामकाज पध्दतीचा गोषवारा. | | ४० गुण |

F:/Exam.CR 406 GR.lwp

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २)पेपर क्र.२ (पुस्तका आधारे) | महाराष्ट्र नागरी सेवा नियम व इतर जिल्हा परिषद नियम | १) महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९८१<br>अ) सर्व साधारण सेवा शर्ती नियम<br>ब) वेतन नियम<br>क) निवृत्ती वेतन नियम<br>२) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या (अंदाजपत्रक) नियम १९६६<br>३) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या (निधीचे पुनर्विनियोजन) नियम १९७१<br>४) जिल्हा परिषद आकस्मिक खर्चाबाबतचे नियम.<br>५) महाराष्ट्र सर्व साधारण भविष्य निर्वाह निधी नियम.<br>६) महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा नियम १९६८ | ३ तास | एकूण १०० गुण<br>६० गुण<br>२ ते ६ साठी ४० गुण प्रत्येक नियमावली साठी ८ गुण |
| ३)पेपर क्र.३<br>भाग-१ (पुस्तका आधारे) | जिल्हा परिषदा कडुन किंवा त्यांच्या अधिपत्याखाली अंमलबजावणी करण्यात येणा-या ग्राम विकास योजना व जिल्हा सेवा शिस्त व अपील नियम. | १) महाराष्ट्र जिल्हा परिषदा, जिल्हा सेवा (सेवा प्रवेश) नियम १९६७<br>२) महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा (शिस्त व अपील) नियम १९६४ | ३ तास | १०० गुण योजना साठी ५० गुण व नियमा साठी ५० गुण |
| भाग दोन (पुस्तका शिवाय ) | | जिल्हा परिषदांकडील सर्वसाधारण योजना (माहितीसाठी पुस्तक विहित केलेले नाही.) जिल्हा परिषदेमधील कर्मचा-यांना या सर्व योजनांची माहिती वेळोवेळी शासन निर्णय, परिपत्रक इ.मधून दिली जाते. | | |

३. मागील वर्षी २७ व २८ डिसेंबर, २००८ रोजी घेण्यात आलेल्या परिक्षेचा निकाल सर्व विभागीय आयुक्त यांनी तत्काळ घोषित करावा. या निकालाच्या अधीन राहून पात्र कर्मचा-यांना २६ व २७ डिसेंबर, २००९ रोजी घेण्यात येणा-या परीक्षेला बसण्यास अनुमती देण्यात यावी.

४. प्रश्नपत्रिका तयार करणे व नमुना उत्तरपत्रिका तयार करण्यासाठी ग्राम विकास विभागाकडून अधिका-यांची नियुक्ती करण्यात येईल. त्यांनी मराठी भाषेमध्ये प्रश्नपत्रिका व नमुना उत्तरपत्रिका तयार करावी, आणि ती गोपनीय स्वरुपात सह सचिव अथवा कार्यासन

अधिकारी आस्था-१० यांच्याकडे पाठवावी. प्रश्नपत्रिका तयार करताना **"उत्तरे मराठीतून लिहावीत, इंग्रजी प्रतिशब्द वापरण्यास हरकत नाही."** अशा आशयाची टीप प्रश्नपत्रिकेच्या वरच्या बाजूस परीक्षकांनी लिहावी. प्रश्नपत्रिका मुद्रित करण्यासाठी व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई यांच्याकडे दिनांक १५ नोव्हेंबर, २००९ पूर्वी पाठवावी. मुद्रणालयानी प्रश्नपत्रिका गोपनीयरित्या मुद्रीत करुन संबंधित विभागीय आयुक्तांकडे त्यांच्या मागणीपत्रानुसार प्रती पाठवाव्यात व प्रत्येक प्रश्नपत्रिकेच्या २० प्रती सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांना पाठवाव्यात. विभागीय आयुक्तांनी त्यांच्या अखत्यारितील प्रत्येक जिल्हयासाठी किती प्रश्नपत्रिका लागतील याबाबतची माहिती व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई यांना दिनांक १५ नोव्हेंबर, २००९ पर्यन्त परस्पर कळवावी व त्याची प्रत शासनास पाठवावी.

५. कर्मचा-यांनी लिहावयाच्या उत्तरपत्रिकेच्या प्रती व पुरवणी पत्रिकेच्या प्रती कशा छापाव्यात याबाबतचे नमुने सोबत जोडले आहेत. विभागीय आयुक्तांनी किती उत्तरपत्रिका व पुरवणी पत्रिका छापून घ्याव्यात याबाबतची संख्या परस्पर व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय यांना कळवावी. उत्तरपत्रिकेचा नमुना ( पहिले पान ) चार भागात कल्पीला आहे. उजव्या कोप-यातील भागावर उत्तर पत्रिका परिक्षकाकडे पाठविण्यापूर्वी आयुक्तांच्या कार्यालयात संकेतक्रमांक देण्यात यावा. हा संकेतक्रमांक आसन क्रमांकाहून वेगळा असावा. हाच संकेतक्रमांक डावीकडील वरच्या भागावर नमूद करावा व नंतर उजवीकडील वरचा भाग उत्तरपत्रिकेपासून कापून वेगळा करावा व त्याचा गठ्ठा सील करुन ठेवावा. उत्तरपत्रिका परिक्षकाकडून तपासून आल्यानंतर त्यावर फक्त संकेतक्रमांक असेल, आसन क्रमांक असणार नाही. आसन क्रमांक व सांकेतांक क्रमांक दोन्हीचा उल्लेख असलेला कापून वेगळा केलेला उजवीकडील वरचा भाग संकेतांकाप्रमाणे निश्चित करुन तो डावीकडील खालच्या को-या भागावर चिकटवावा.

६. व्यवस्थापक शासकीय मुद्रणालय, मुंबई यांनी सर्व विभागीय आयुक्तांना छापील प्रश्नपत्रिकेची जिल्हानिहाय मोहरबंद पाकीटे विभागीय आयुक्तांनी यासंबंधात प्राधिकृत केलेल्या अधिका-याकडे सुपूर्द करावी. विभागीय आयुक्तांनी याबाबत आपल्या कार्यालयातील एका अधिका-यास प्राधिकृत करावे व त्या अधिका-यास शासकीय मुद्रणालयातून प्रश्नपत्रिकेची मोहरबंद पाकीटे आणण्यासाठी परीक्षेपूर्वी ७ दिवस अगोदर पाठवावे. प्रश्नपत्रिका, उत्तरपत्रिका व पुरवणी पत्रिका इत्यादीचा छपाईचा खर्च शासकीय मुद्रणालयानी संबंधित विभागीय आयुक्तांकडुन आलेल्या प्रश्नपत्रिका छापण्याच्या प्रतीची संख्या विचारात घेऊन त्यांच्याकडून वसूल करावा.

७. प्रश्नपत्रिकाचे मुद्रण करताना प्रत्येक प्रश्नपत्रिकेच्या अगदी वरच्या बाजूस खाली दर्शविल्याप्रमाणे परीक्षेचा दिनांक व वेळ मुद्रीत करण्याची व्यवस्था व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई यांनी कृपया करावी.

| पेपर क्र. | विषय | दिनांक व वेळ |
|---|---|---|
| १) | जिल्हा परिषद, पंचायत समित्या व ग्राम पंचायत यांचे सामान्य प्रशासन | शनिवार दिनांक २६ डिसेंबर, २००९ (सकाळी १०.०० ते दुपारी १.०० ) |
| २) | महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९८१ व इतर जिल्हा परिषद नियम | शनिवार दिनांक २६ डिसेंबर, २००९ (दुपारी २.०० ते ५.०० ) |
| ३) | जिल्हा परिषदांकडून किंवा त्यांच्या अखत्यारीखालील अंमलबजावणी करण्यात येणा-या योजना व महाराष्ट्र जिल्हा परिषदा, जिल्हा सेवा (शिस्त व अपील) नियम १९६४. | रविवार, दिनांक २७ डिसेंबर २००९ (सकाळी १०.०० ते दुपारी १.०० ) |

८. परिक्षेचा पाठयक्रम सर्व जिल्हा परिषदांनी जि.प. कर्मचा-यांच्या निदर्शनास आणावा या परीक्षा जिल्हा स्तरावर आयोजित करण्यात याव्यात. त्यासंबंधीची सर्व व्यवस्था विभागीय आयुक्तांनी करावी. व्यवस्थापन पूर्ण झाल्याबद्दल परीक्षेपूर्वी खात्री करुन घ्यावी.

९. प्रश्नपत्रिका व उत्तरपत्रिका एका कार्यालयातून दुस-या कार्यालयाकडे पाठविताना त्या दुहेरी मोहोरबंद पाकीटामधून गोपनीयरितीने खास विश्वासू दुतामार्फत पाठवाव्यात.

१०. संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामुग्री मुंबई यांनी प्रत्येक प्रश्नपत्रिकेच्या २० प्रती त्यांच्या हस्तलिखिताच्या प्रतीसह ग्राम विकास व जलसंधारण विभागाकडे अभिलेखासाठी परीक्षा झाल्यानंतर पाठवाव्यात. तसेच त्यांच्या १० प्रती सर्व विभागीय आयुक्तांकडे पाठवाव्यात.

११. नमुना उत्तरपत्रिका गोपनीयरित्या विभागीय आयुक्तांकडे ग्राम विकास व जलसंधारण विभागाकडून पाठविल्या जातील. उत्तर पत्रिका तपासणे व निकाल जाहीर करणे, ही कार्यवाही विभागीय आयुक्तांनी करावयाची आहे.

१२. हा खर्च मागणी क्रमांक एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन १०१ आयुक्त (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या प्रशासन (२०५३ ०६०९) या लेखाशिर्षाखाली चालू आर्थिक वर्षासाठी केलेल्या तरतुदीतून मागविण्यात यावा.

१३. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २००९१०३०१७५९४८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( मोहम्मद हुसेन मुजावर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) विभागीय आयुक्त, (सर्व)
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३) संचालक, शासकीय मुद्रण व लेखन सामग्री संचालनालय, चर्नीरोड, मुंबई-४०० ००४.
४) व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नीरोड, मुंबई ४०० ००४.
५) कार्यासन अधिकारी वित्त-१ (२९) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मुंबई.
६) निवड नस्ती आस्था-१०, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

F:/Exam.CR 406 GR.lwp

महाराष्ट्र जिल्हा परिषदा (जिल्हा सेवा) सेवाप्रवेशोत्तर परिक्षा २००९.

**विभागीय आयुक्त (विभाग)**

**उमेदवारांना सूचना :-**

१) उमेदवाराने केवळ आवश्यक असलेला तपशीलच खाली भरावा. त्याने या पृष्ठाच्या या भागावर किंवा उत्तर पत्रिकेतील कोणत्याही पानावर कोठेही आपले नांव किंवा आसन क्र. लिहू नये.

२) उमेदवारांनी त्यांना संदर्भासाठी वापरण्यास परवानगी दिलेल्या पुस्तका खेरीज अन्य कोणतीही पुस्तके किंवा टिप्पणी आपल्या जवळ ठेवू नयेत.

४) उत्तरे मराठीत लिहिणे बंधनकारक राहील. विषय :-

महाराष्ट्र जिल्हा परिषदा (जिल्हा सेवा) सेवाप्रवेशोत्तर परिक्षा २००९.

**विभागीय आयुक्त (विभाग)**

**(खालील माहिती फक्त उमेदवारांनीय भरावयाची आहे.)**

सूचना :- हे मुद्रित पृष्ठ प्रथम वर ठेवावे.

उत्तरे लिहिण्यात सुरुवात करण्यापूर्वी उमेदवारांनी खालील माहिती काळजीपूर्वक व स्पष्टपणे भरावी.

आसन क्रमांक :-

नांव :- (आडनांव प्रथम लिहावे)

विषय :-

पेपर क्र. भाग

दिनांक

---

मिळालेले गुण
(परिक्षकांनी भरावयाचे)

| | प्रश्न क्र. | एकूण गुण | मिळालेले गुण | शेरा |
|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ |
| १ | | | | |
| २ | | | | |
| ३ | | | | |
| ४ | | | | |
| ५ | | | | |
| ६ | | | | |
| ७ | | | | |
| ८ | | | | |
| ९ | | | | |
| १० | | | | |
| एकूण | | | | |

परिक्षकांची सही/-

